राज्याचे सर्वसमावेशक ज्येष्ठ नागरिक
धोरणाची अंमलबजावणी करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : व्हीआयपी-०८१८/ प्र.क्र. ४६४/ पोल-१३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १० सप्टेंबर, २०१८.

वाचा : शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: ज्येष्ठना २०१६/प्र.क्र. ७१/सामासू, दिनांक ९ जुलै, २०१८.

**परिपत्रक :-**

ज्येष्ठ नागरिक सुस्थितीत असण्याच्या दृष्टीने सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक ९ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये , राज्याचे सर्वसमावेशक ज्येष्ठ नागरिक धोरण २०१३ ची अंमलबजावणी करण्यासंदर्भात सुचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर धोरणाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

१. ज्येष्ठ नागरिकांचा विविध स्तरातून होणारा छळ, पिळवणूक, यापासून त्यांचे संरक्षण करण्यात यावे.
२. प्रत्येक जिल्हयाच्या ठिकाणी तसेच पोलीस आयुक्तालयात ज्येष्ठ नागरिकांसाठी हेल्प लाईनसुरू करण्यात यावी. याद्वारे आणिबाणीच्या वेळी ज्येष्ठ नागरिकांना तात्काळ आरोग्य सेवा आवश्यक सुचना तथा सुरक्षा विषयक मदत उपलब्ध करण्याबाबत उचित कार्यवाही करावी.
३. ज्येष्ठ नागरिकांना आपत्कालीन परिस्थिती तातडीने मदत मिळण्यासाठी आधुनिक तंत्राचा वापर करून आपात्कालीन सतर्क करणारी (Emergency Alert System) विकसित करण्यात यावीत. त्यामध्ये उदा. मोबाईल अलार्म, इंटरनेट, जी.पी.एस. याद्वारे सुरक्षेसाठी संपर्क केल्यास संकट समयी ज्येष्ठ नागरिकांना आहे त्या ठिकाणी मदत देणे शक्य होईल.
४. पोलीसांनी ज्येष्ठांची सुरक्षितता व अन्य प्रश्न यामध्ये जाणीवपूर्वक प्रयत्नशील राहण्यासाठी जागरूकता दाखवावी. ज्येष्ठ नागरिकांना होणारे विविध सतावणुकीसंबंधी (Elderly abuse) तक्रारी प्राधान्याने व खास लक्ष देऊन कायद्याच्या चौकटीत सोडविण्यासाठी प्रयत्न करण्यात यावे.
५. आई वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याणासाठी नियम-२०१० च्या प्रकरण ६ मधील नियम २० मध्ये ज्येष्ठ नागरिकांच्या जिवितांचे व मालमत्तेचे संरक्षण करण्याबाबत कृती आराखडा विनिर्दिष्ठ केला आहे. त्याचप्रमाणे पोलीस ठाण्यात त्यांच्या हद्दीत राहणाऱ्या सर्व ज्येष्ठ नागरिकांचे विशेषत: एकाकी राहणाऱ्या ज्येष्ठ नागरिकांची अद्ययावत यादी ठेवण्यात यावी.
६. पोलीस ज्येष्ठ नागरिकांवर मैत्रीपूर्ण लक्ष ठेवतील. पोलीस ठाण्याच्या प्रतिनिधीने सामाजिक कार्यकर्ता अथवा स्वयंसेवक यांच्यासह नियमितपणे एकाकी व अशक्त ज्येष्ठ नागरिकांनी सदिच्छा भेट द्यावी यासाठी पोलीसांनी सामाजिक संस्थांची मदत घ्यावी.(उदा. हेल्पेज इंडीया)

७. पोलीस घटक प्रमुख यांनी वरील सूचना सर्व पोलीस ठाण्याचे प्रभारी अधिकारी यांच्या निदर्शनास आणाव्यात व त्या सूचनांचे तंतोतंत पालन होईल यासाठी आवश्यक खबरदारी घ्यावी. तसेच, याच्या अंमलबजावणीचा आढावा गुन्हे बैठकीमध्ये घेण्यात यावा.

८. पोलीस महासंचालक व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी यासाठी त्यांच्या कार्यालयात समन्वय अधिकारी (Nodal Officer) नेमावा व ज्येष्ठ नागरिकांच्या संदर्भातील उपरोक्त सूचनांच्या अंमलबजावणीचा नियमितपणे आढावा घ्यावा.

२. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०९१११४४०९२१२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yuvraj B Ajetrao

Digitally signed by Yuvraj B Ajetrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68e6425b3accbc2689913c8cbb128d17b6b5411a5b0ad04137df39fe6ab84da7, cn=Yuvraj B Ajetrao
Date: 2018.09.12 16:44:50 +05'30'

**( युवराज अजेटराव )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अ.मु.स.,मंत्रालय मुंबई.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन, मलबार हिल मुंबई.
५) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (५ प्रती)
७) महासंचालक, माहीती व जनसंपर्क महासंचालनालय.
८) मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९) मा.मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय मुंबई.
१०) सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक
११) सर्व पोलीस अधीक्षक/पोलीस आयुक्त.
१२) निवड नस्ती.(पोल-१३)